**केंद्र पुरस्कृत योजना कापूस तंत्रज्ञान अभियान सन २०१०-११**
**मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-कापूस-१६१०/प्र.क्र.७४/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक- २९ डिसेंबर, २०१०**

**संदर्भ:-** १) केंद्र शासन, कृषि मंत्रालय पत्र क्र. १८-१/२००९/सीअे-५, दिनांक २७ एप्रिल,२०१० दि.२६ जुलै,२०१० व दि. ९ नोव्हेंबर, २०१०

२) शासन निर्णय समक्रमांक,दि. ११ जून, २०१० व दि.१४ सप्टेंबर, २०१०

३)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कापूस/योजना/२०१०-११/२६६/विप्र-३/३८०/१०,दि . २५/११/१०.

**प्रस्तावना:-**

कापूस पिकाचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याच्या दृष्टीने केंद्र पुरस्कृत सधन कापूस विकास कार्यक्रम राज्यात सन १९८२-८३ पासून राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण अनुक्रमे ७५: २५ असे आहे. केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक २७ एप्रिल, २०१० च्या पत्रान्वये सन २०१०-११ मध्ये सदर योंजना राबविण्याकरिता एकूण रु.१५७.३३ लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०१०-११ मध्ये राबविण्याकरिता रु.१५७.३३ लाखाच्या कार्यक्रमास (यामध्ये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा अनुक्रमे रु.१२५.५० लाख व रु.३१.८३ लाख असा आहे ) संदर्भाधीन दि.११ जून २०१० च्या शासन निर्णयान्वये शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे . केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक २६ जुलै, २०१० च्या पत्रान्वये मुक्त केलेल्या केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटीच्या रु. ७५.०० लाखाच्या कार्यक्रमास दि. १४ सप्टेंबर, २०१० च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि.९ नोव्हेंबर, २०१० च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत सधन कापूस विकास कार्यक्रमांतर्गत दुसऱ्या हप्त्यापोटी केंद्र हिश्श्याचा रु.५०.०० लाख निधी मुक्त केला आहे. केंद्र शासनाने दिलेली वित्तीय मान्यता विचारात घेऊन केंद्र हिश्श्याच्या रु. ५०.०० लाखाच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सधन कापूस विकास कार्यक्रम राज्यात सन २०१०-११ मध्ये राबविण्याकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. ९ नोव्हेंबर, २०१० च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्याचे दुसऱ्या हप्त्यापोटी रु.५०.०० लाख निधी मुक्त केला आहे. केंद्र शासनाने दिलेली वित्तीय मान्यता विचारात घेऊन केंद्र हिश्श्याच्या रु. ५०.०० लाख कार्यक्रमास या शासन निर्णयाद्वारे वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी यांच्या अख्यत्यारितील जिल्हानिहाय कार्यक्रमास वित्तिय तरतूद सबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून स्वतंत्रपणे वितरीत करण्यात येईल. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक : डी-३** **(रु. लाखात )**

**२४०१- पीक संवर्धन**

**१०८, वाणिज्यिक पिके**

**केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५ टक्के ) (०१)(०२)**

**कापूस विकासासाठी तंत्रज्ञान अभियांन (२४०१ २५४२) ,** **५०.००**

**३३ अर्थसहाय्य**

३. या योजनेची अमंलबजावणी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच संदर्भाधीन अ. क्र. २ येथील शासन निर्णया मधील सूचनांनुसार करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय **वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२६०/१०/व्यय-१, दि. २४ डिसेंबर, २०१० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व त्याचप्रमाणे प्रधान सचिव (कृषि)** यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०१०११६५२१५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( वि. मा. बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,
आरे दुग्ध कॉलनी गोरेगांव (पूर्व),मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर,अकोला.
सहसंचालक,लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,५वा मजला, मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, (का.१४८१ /१४३१) मंत्रालय, मुंबई ३२.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३.
सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी,
कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन).
निवड नस्ती